अमरावती जिल्हयातील मेळघाट क्षेत्रातील उपजिल्हा रुग्णालय, ग्रामीण रुग्णालय, प्राथमिक आरोग्य केंद्रे, उपकेंद्रातील (Wash Basin, Toilet, Bath Repair) तसेच माहेरघर दुरुस्तीच्या अंदाजपत्रक व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२३/प्र.क्र.१३३/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १९ जून, २०२३.

**वाचा :**

१) अधिक्षक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी, मुंबई यांचे पत्र क्रमांक-राआसो/पासुविक/१५८०७-८०८/२०२३ दि.०९.०५.२०२३

२) शासन निर्णय क्र. अर्थस२०२०/प्र.क्र.७३/अर्थसंकल्प दि.०९.११.२०२१.

**प्रस्तावना :**

अमरावती जिल्हयातील मेळघाट उपजिल्हा रुग्णालय, ग्रामीण रुग्णालय, प्राथमिक आरोग्य केंद्रे, उपकेंद्रातील (Wash Basin, Toilet, Bath Repair) तसेच माहेरघर दुरुस्तीच्या रु.१००.४५ लक्ष इतक्या किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. या बाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :

अमरावती जिल्हयातील मेळघाट क्षेत्रातील उपजिल्हा रुग्णालय, ग्रामीण रुग्णालय, प्राथमिक आरोग्य केंद्रे, उपकेंद्रातील (Wash Basin, Toilet, Bath Repair) तसेच माहेरघर दुरुस्तीच्या रु.१००.४५ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रक व आराखडयास खालील प्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यतेची किंमत (रु. लाखात) |
|---|---|---|
| १ | तालुका चिखलदरा जिल्हा अमरावती येथील उपजिल्हा रुग्णालय, ग्रामीण रुग्णालय, प्राथमिक आरोग्य केंद्र व उपकेंद्रांतील (Wash Basin, Toilet, Bath) दुरुस्ती करणे | १९.४० |

| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यतेची किंमत (रु. लाखात) |
|---|---|---|
| २ | तालुका धारणी जिल्हा अमरावती येथील उपजिलहा रुग्णालय, ग्रामीण रुग्णालय, प्राथमिक आरोग्य केंद्र व उपकेंद्रांतील (Wash Basin, Toilet, Bath) दुरुस्ती करणे | २१.०५ |
| ३ | तालुका चिखलदरा, धारणी जिल्हा अमरावती येथील माहेर घर दुरुस्ती करणे. | ६०.०० |
| | **एकूण** | **१००.४५** |

२. अनुशेषांतर्गत प्राथमिक आरोग्य केंद्र व उपकेंद्र वगळता अन्य प्राथमिक आरोग्य केंद्र व उपकेंद्र बांधकामासाठी जिल्हा नियोजन विकास मंडळ यांच्यामार्फत निधी उपलब्ध करुन दिला जातो. त्यानुसार उपरोक्त बांधकाम करण्यासाठी वाचा येथील अनुक्रमांक २ येथे नमूद शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनानुसार तसेच त्यामधील जिल्हा नियोजन विकास मंडळा अंतर्गत उपलब्ध असलेल्या निधीमधून सदर खर्च भागविण्यात यावा.

३. उपरोक्त अटी व शर्ती बरोबरच सदर निधी खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करणे ही जबाबदारी संबंधित अधिकाऱ्याची राहील.

४. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक-१३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१९१४५८४६७७१७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: CN = ASHOK MAROTI ATRAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH DEPARTMENT
Date: 2023.06.19 16:38:56 +05'30'

**(अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, अमरावती.
४. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालय राज्यस्तर), मुंबई.
६. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अमरावती.
८. जिल्हा कोषागार अधिकारी,जिल्हा अमरावती.
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३).